**दक्षता पथक कार्यालयास पदे**
**उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/प्र.क्र.२९१/२०१६/आ.(प्रशि)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २९ नोव्हेंबर, २०१६.

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
२) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१६/प्र.क्र.२३७/२०१६/सिंव्य(म), दिनांक १०/०६/२०१६
३) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, संकीर्ण-००१६/प्र.क्र.४८३/२०१६/मोप्र-१, दिनांक २५/०७/२०१६
४) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१२/प्र.क्र.६८/(४७/२०१२)/दक्षता-१, दिनांक २१/१०/२०१६
५) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१६/प्र.क्र.२७२/२०१६/आ.(प्रशि), दिनांक ११/११/२०१६
६) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१६/प्र.क्र.२७२/२०१६/आ.(प्रशि), दिनांक २८/११/२०१६

प्रस्तावना

सिंचन विषयक विशेष चौकशी समितीच्या अहवालातील प्रस्तावित ४२ सुधारणांच्या अंमलबजावणीसाठी अ.क्र.३ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधाप्रमाणे ५ दक्षता पथकांकडील १४५ पदे तसेच ४ परिमंडळीय कार्यालयांकडील कामकाज हाताळण्यासाठी २० अतिरिक्त पदे मंजूर करुन एकूण १६५ पदांचा सुधारीत आकृतीबंध अ.क्र.४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधानुसार ५ दक्षता पथकांसाठी कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील प्रत्येकी २ अशी एकूण १० पदांचा मापदंड निश्चित करण्यात आला आहे.

तसेच, अ.क्र.२ च्या शासन निर्णयान्वये १) कुकडी प्रकल्प भूविकास विभाग क्र.१, अहमदनगर, २) पिंपळगांव जोगे धरण विभाग, नारायणगांव, ३) सिना माढा प्रकल्प विभाग, भिमानगर, ४) कोळकेवाडी धरण व्यवस्थापन विभाग, अलोरे व ५) घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.३, चौंढे तसेच अ.क्र.५ अन्वये कार्यकारी अभियंता, खरेदी समिती (इ), नागपूर व कार्यकारी अभियंता, खरेदी सल्लागार समिती, अमरावती या दोन व अ.क्र.६ अन्वये कार्यकारी अभियंता, खरेदी प्रापण पथक, नागपूर (खरेदी सल्लागार समिती-ई) अशा ३ विभागीय समित्या अशी एकूण ८ विभागीय कार्यालये बंद करण्यात आली आहेत. बंद करण्यात आलेल्या कार्यालयांकडील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील ८ मंजूर पदे दक्षता पथक कार्यालयास फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

बंद करण्यात आलेल्या खालील नमूद कार्यालयांकडील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील ८ मंजूर पदे दक्षता पथक कार्यालयास उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बंद करण्यात आलेल्या कार्यालयाचे नांव | पद उपलब्ध करुन द्यावयाच्या कार्यालयाचे नांव |
|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता, कुकडी प्रकल्प भूविकास विभाग क्र.१, अहमदनगर, | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, औरंगाबाद |
| २ | कार्यकारी अभियंता, पिंपळगांव जोगे धरण विभाग, नारायणगांव | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, पुणे |
| ३ | कार्यकारी अभियंता, कोळकेवाडी धरण व्यवस्थापन विभाग, अलोरे | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे |
| ४ | कार्यकारी अभियंता, सिना माढा प्रकल्प विभाग, भिमानगर | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे |
| ५ | कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.३, चोंढे | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, अमरावती |
| ६ | कार्यकारी अभियंता, खरेदी समिति (इ), नागपूर | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, नागपूर |
| ७ | कार्यकारी अभियंता, खरेदी सल्लागार समिती, अमरावती | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, अमरावती |
| ८ | कार्यकारी अभियंता, खरेदी प्रापण पथक, नागपूर (खरेदी सल्लागार समिती-ई) | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, नागपूर |

२. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, पुणे व औरंगाबाद या कार्यालयांकरिता निश्चित करण्यात आलेल्या मापदंडानुसार कार्यकारी अभियंता या संवर्गातील उर्वरित पदे यथावकाश उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२९१२१७४९४२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.11.29 12:20:04 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व).

७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
१७) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, नागपूर.
१८) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, अमरावती.
१९) मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर.
२०) मुख्य अभियंता (स्थापत्य) व गुणनियंत्रण, पुणे.
२१) सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२२) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे/पुणे/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.
२४) अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई. (जलसंपदा विभागाच्या HRMS-WRD या संकेतस्थळावर व ई-सेवापुस्तकात आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२५) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.